महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास "१३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली वर्ष २०१८-१९ साठी अनुदान वितरित करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बियुडी २०१८/प्र.क्र.१२४(भाग-१)/कार्या-४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १७.१०.२०१८

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०१८/प्रक्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: पूरक २०१८/प्रक्र.९५/अर्थ-३, दि.२७ जुलै, २०१८

३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक: बियुडी २०१८/प्रक्र.१२४/का.४, दि.२७ एप्रिल, २०१८

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास सन २०१८ -१९ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून ३०% प्रमाणे शिल्लक असलेले अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात "१३-कार्यालयीन खर्च" या उद्दीष्टासाठी रु.७,५८,०००/- (रुपये सात लाख अठ्ठावन्न हजार मात्र) इतके अनिवार्य खर्चासाठी अनुदान मंजूर आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ व २ येथील परिपत्रकान्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये माहे एप्रिल, २०१८ व डिसेंबर, २०१८ या नऊ महिन्यांच्या कालावधीसाठी "१३-कार्यालयीन खर्च" या उद्दीष्टासाठी रु.५,३०,६००/- (रुपये पाच लाख तीस हजार सहाशे मात्र) इतके अनुदान वितरित करण्यात आले आहे. आता महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरणाने मागणी केल्यानुसार "१३-कार्यालयीन खर्च" या उद्दीष्टाखाली ३०% प्रमाणे शिल्लक असलेले उर्वरित रु.२,२७,४००/- (रुपये दोन लाख सत्तावीस हजार चारशे मात्र) इतके अनुदान पीठासीन अधिकारी, महाराट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. पीठासीन अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

उपरोक्त खर्च "मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०१) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, आस्थापना खर्च (२०५३१२५ ८), "१३-कार्यालयीन खर्च" योजनेत्तर" या लेखाशीर्षाखाली खर्च टाकण्यात यावा.

हा शासन निर्णय, वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.२२८/२०१८/व्यय-१, दि.१०.१०.२०१८ आणि क्र.२८४/ अर्थ-१४/१८, दि.१०.१०.२०१८ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१६१५०३१९१४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Sadashiv Choukekar

Digitally signed by Mahesh Sadashiv Choukekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=965737dc18a2c1fbaf047c7a9f61259e5c65db981c8eaaab6c983897e5318874,
serialNumber=d8e4f67b3825f197df63f949fa4b661ca6c21333d9afdb92501b830b9d0ca5c6, cn=Mahesh Sadashiv Choukekar
Date: 2018.10.17 15:31:59 +05'30'

( म.स.चौकेकर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग
२. पीठासीन अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद,
३. जिल्हाधिकारी, औरंगाबाद,
४. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
५. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
७. उपसचिव (कोषा/प्र.१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. कार्यासन अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. निवडनस्ती/कार्यासन-४ संग्रहार्थ.